# महाराष्ट्र विधानपरिषद

# पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**नाशिक शहरातील बेपत्ता तरुणाचा शोध लावणेसाठी या गुन्हयाचा तपास गुन्हे अन्वेषण विभागाकडे वर्ग करणेबाबत**

**(१) १९५५६ (१९-०८-२०१६). श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक शहरातील दिनांक २० ऑगस्ट, २०१५ रोजी पासून बेपत्ता तरुणाचा शोध लावण्यासाठी या गुन्हयाचा तपास गुन्हा अन्वेषण विभागाकडे वर्ग करण्यासाठी मा.गृह राज्यमंत्री यांनी माहे डिसेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान पोलीस आयुक्त, नाशिक यांना आदेश दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर तरुणाकडील मोबाईल फोन व वाहन आढळून येवूनही केवळ शहर पोलिसांकडून उपलब्ध तंत्रज्ञानाचा पूर्ण क्षमतेने वापर न झाल्यामुळे सदर तपास गुन्हे अन्वेषण विभागाकडे वर्ग करण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे मागणी केलेली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-१२-२०१७) :** (१) होय.
(२) व (३) सदर प्रकरणी पंचवटी पोलीस स्टेशन येथे गु.र.नं. ४३७/२०१५ भादंवि कलम ३६३ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

सदर गुन्हयात पोलीसांकडून उपलब्ध तंत्रज्ञानाचा पूर्ण क्षमतेने वापर करण्यात आलेला आहे. आवश्यक ते मोबाईल संबंधी रेकॉर्ड उपलब्ध करण्यात येवून तपासण्यात आलेले आहे. त्यातून निष्पन्न झालेल्या बाबीसंबंधी देखील तपास करण्यात आलेला आहे. तथापि सदर तरुणाशी संबंधित सखोल तपास व्हावा याकरिता स्थानिक लोकप्रतिनिधींनी तपास गुन्हे शाखेकडे वर्ग करण्यात यावा, याबाबत शासनाकडे मागणी केलेली होती. त्यानुषंगाने सदर गुन्हयाचा तपास गुन्हे अन्वेषण विभागामार्फत करण्यात येत आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

## येवला (जि.नाशिक) तालुक्यात कृषी महाविद्यालय व शेतकरी प्रशिक्षण केंद्र निर्माण करण्याबाबत

**(२) २७१७८ (१३-०४-२०१७). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) येवला (जि.नाशिक) येथे शासकीय कृषी महाविद्यालय व शेतकरी प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे ऑक्टोबर, २०१५ मध्ये व दिनांक १ सप्टेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद आणि शासनाकडे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, तद्नुसार येवला (जि.नाशिक) येथे शासकीय कृषी महाविद्यालय व शेतकरी प्रशिक्षण केंद्र बांधण्याची आवश्यकता तपासून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्याकरीता महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी यांना माहे सप्टेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निर्देश दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून येवला येथे शासकीय कृषी महाविद्यालय व शेतकरी प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.पांडुरंग फुंडकर (२२-१२-२०१७) :** (१), (२) व (३) येवला (जि.नाशिक) येथे कृषी महाविद्यालय व शेतकरी प्रशिक्षण केंद्र मंजूर करण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी मागणी केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने तपासणी करण्याचे निर्देश महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषदेला देण्यात आले होते.

कृषी महाविद्यालय स्थापन करावयाच्या निकषानुसार येवला येथे जमीन उपलब्ध नसल्याबाबत महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी यांच्याकडून अहवाल प्राप्त झाला आहे.

तसेच दिनांक १०.०७.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत मा.राज्यपाल महोदयांनी सध्या शासनाने मंजूर केलेल्या कृषी महाविद्यालयांना आवश्यक त्या शैक्षणिक व इतर सोईसुविधा उपलब्ध करुन देण्याचे दायित्व पूर्ण होईपर्यंत नवीन कृषी महाविद्यालयांना मान्यता देण्यात येऊ नयेत असे निदेश दिले आहेत. त्याचप्रमाणे कृषी शिक्षणाच्या गुणवत्तेचा विचार न होता झालेला विस्तार, अपुऱ्या सुविधा तसेच चालू कामांचा आवर्ती खर्च, भारतीय कृषी अनुसंधान परिषदेने कृषी विद्यापीठांची मान्यता निलंबित करणे या अनुषंगाने कृषी शिक्षणाचा बृहत आराखडा शासनास तातडीने सादर करण्याकरिता महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद यांना सूचना देण्यात आल्या आहेत.

शेतकरी प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याबाबत सद्य:स्थितीत कोणतीही योजना नाही. तथापि, शेतकऱ्यांना प्रशिक्षण देणेबाबत हंगामनिहाय वेगवेगळया पिक योजनेमधून प्रशिक्षित करण्याची कार्यवाही विस्तार व प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत तालुका स्तरावरुन वेळोवेळी करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वक्फ मालमत्तेवरील इतरांची नावे हटवून वक्फ मालमत्ता अशी नोंद घेण्याबाबत

**(३) २७७२१ (१५-०४-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २४५०० ला दिनांक १५ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वक्फ मालमत्तेवर नोंदविलेले इतरांची नावे हटवून त्या ठिकाणी वक्फ प्रतिबंधित सत्ता प्रकार अशी नोंद घेण्याबाबत प्रधान सचिव, महसूल व वन विभाग यांनी माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान शासन निर्णय निर्गमित केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, परभणी जिल्हयातील बहुतांशी वक्फ मालमत्तेवर इतरांची नावे सात बारा व प्रॉपर्टी कार्डवर नमुद असतांना तहसिलदार व उपविभागीय अधिकारी यांनी अद्यापपर्यंत अर्धन्यायीक सुनावण्या न घेता व बेकायदेशीर नावे न हटविता वरील शासन आदेशाचा अवमान केल्यावरून त्यांच्याविरूध्द कारवाई करण्याबाबत परभणी येथील सामाजिक कार्यकर्त्यानी जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान लेखी तक्रारी केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून संबंधित दोषी तहसिलदार व उपविभागीय अधिकारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-१२-२०१७) :** (१) होय.

(२) होय, एका सामाजिक कार्यकर्त्याने याबाबत तक्रार केली आहे. तथापि, जिल्हाधिकारी, परभणी यांनी सादर केलेल्या अहवालानुसार परभणी जिल्हयातील सर्व वक्फ मालमत्तांवर वक्फ मंडळाचे नांव नोंदविणे व “वक्फ प्रतिबंधित सत्ता प्रकार” अशी नोंद घेण्याबाबत कार्यवाही करण्यात येत असून जिल्हयातील ३१९ वक्फ मालमत्तापैकी १३५ वक्फ मालमत्तेची ७/१२ वर नोंद घेण्यात आली आहे. उर्वरित १८४ वक्फ मालमत्ताच्या प्रकरणात तक्रारी/न्यायप्रविष्ठ असल्याने ७/१२ वर नोंद घेता आली नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**जळगांव शहरातील सिंधी कॉलनीतील भगवती अपार्टमेंटमध्ये घरफोडी झाल्याबाबत**

**(४) २९६०६ (१३-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जळगांव शहरातील सिंधी कॉलनीतील भगवती अपार्टमेंटमध्ये दिनांक ३१ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास घरफोडी झाली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या घरफोडीत किती ऐवज व रोख रक्कम चोरण्यात आली आहे,
(३) असल्यास, या प्रकरणी आतापर्यंत किती जणांना अटक करण्यात आली व त्यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) सदर घरफोडीत अज्ञात चोरट्यांनी घराचे कुलुप तोडून घरातील १५,४०,८००/- रुपये किंमतीचे सोने, चांदीचे दागिने व रोख रक्कम असा ऐवज चोरुन नेला आहे. या प्रकरणी जिल्हापेठ पोलीस स्टेशन येथे गु.र.नं. ०२/२०१७, भा.दं.वि.कलम ४५४, ३८० प्रमाणे दिनांक ०१/०१/२०१७ रोजी गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यातील आरोपींचा शोध घेण्यासाठी सातत्याने संशयितांची तपासणी करण्यात येत आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

**अमळनेर (जि.जळगांव) येथील तरुणाला नोकरी लावून देण्याच्या अमिष दाखवून फसवणूक केल्याबाबत**

**(५) २९६३१ (१३-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगांव) येथील रहिवाशी व नाशिक येथे अभियांत्रिकी महाविद्यालयात शिकत असलेल्या तरुणाला परीक्षेत उत्तीर्ण करून नोकरी लावून देण्याच्या अमिषाने नाशिक येथील एका संशयिताने सुमारे २४ लाख रुपयाला फसविल्याचा गुन्हा दिनांक १० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास नाशिक येथील पोलीस स्थानकात दाखल करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणी किती जणांना अटक करण्यात आले आहे व त्यांचेवर कोणत्या कलमान्वये कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही,

या प्रकरणी पोलीस आयुक्त, नाशिक शहर, पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण) व पोलीस अधिक्षक, जळगांव या घटकात तक्रार अथवा गुन्हा दाखल नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील भायखळा येथील दलाराम इमारतीतील रहिवाश्यांना हक्काची घरे देण्याबाबत

**(६) ३४७०९ (२१-११-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील भायखळा येथील दलाराम इमारत धोकादायक झाल्यामुळे ४२ वर्षापूर्वी येथील रहिवाशांना विक्रोळी येथील संक्रमण शिबिरात ४० ते ४५ कुटुंबियांना स्थलांतरित करण्यात आले होते त्यावेळी त्यांनी जुन्या इमारतीची भाडे पावती, मतदार यादीतील नावे इत्यादी ११ प्रकारची कागदपत्रे म्हाडाकडे जमा केली होती पण म्हाडाच्या कार्यालयातून ही मुळ कागदपत्रेच गहाळ झाल्याने म्हाडाने या ४० ते ४५ कुटूंबियांना अपात्र ठरविल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त कुटुंबियांनी म्हाडाचे अधिकारी व दलाल यांनी संगनमत करुन उक्त कागदपत्रे गहाळ केले असल्याचा आरोप करुन त्यांच्या विरोधात वांद्रे (पूर्व) येथील खेरवाडी पोलीस ठाण्यात माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान त्यांच्याविरुध्द गुन्हा दाखल केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार उक्त रहिवाशांना त्यांची हक्काची घरे देण्याबाबत तसेच म्हाडाचे संबंधित दोषी अधिकारी व दलालांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१३-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही. या प्रश्नामध्ये मुंबईतील भायखळा येथील दलाराम इमारत असे नाव नमूद करण्यात आले असले तरी प्रत्यक्षात त्या इमारतीचे नाव ७७५-७८१ दत्ताराम बिल्डिंग, बी जे मार्ग भायखळा असे आहे. म्हाडाकडे उपलब्ध अभिलेखावरुन सदर इमारतीमधील गाळयांची संख्या एकुण २७ असून त्यापैकी गाळा क्र. १ ते ७ व गाळा क्र. १४ आणि १५ हे अनिवासी वापराकरिता होते, असे म्हाडाने कळविले आहे. यावरुन सदर इमारतीमधील ४०-४५ कुटूंबियांना स्थलांतरीत केले असे म्हणणे खरे नाही.

अनिवासी गाळेधारकांना संक्रमण शिबीरामध्ये स्थलांतरीत करण्याचे धोरण नाही. तसेच, सदर इमारतीचा तळ मजला अस्तित्वात असल्यामुळे अनिवासी गाळे धारकांना संक्रमण शिबीरामध्ये स्थलांतरीत करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तसेच, उपलब्ध स्कॅनिंग डाटाच्या आधारे म्हाडाने सदर इमारतीतील १८ निवासी गाळे धारकांपैकी ९ गाळे धारकांना बृहतसूचीवरुन पात्र करुन त्यांना गाळयाचे वितरण केले आहे.

(२) हे खरे नाही.

(३) म्हाडाने त्यांच्या कार्यालयातील अधिकारी तसेच कर्मचाऱ्यांमार्फत नस्तींचा शोध घेण्याची मोहिम यापुर्वी दिनांक १७/०४/२०१७ रोजीच्या पत्रान्वये राबविण्यात आली. सदर शोध मोहिमेदरम्यान उपमुख्य अधिकारी/ पुनर्रचित गाळे कार्यालयातील गहाळ झालेल्या काही नस्ती मंडळातील विविध विभागीय कार्यालयात आढळून आल्या होत्या. अजुनही काही अर्जदारांची मुळ कागदपत्रे विभागीय कार्यालयामध्ये असल्याची शक्यता असल्याने पुन्हा नस्तींचा शोध घेण्याची मोहिम राबविण्यात येत असल्याचे म्हाडाने कळविले आहे.

त्याचप्रमाणे ज्या प्रकरणांमध्ये मुळ कागदपत्रे जमा केल्याची पोहच आहे. परंतु, या कार्यालयामध्ये त्यांची मुळ कागदपत्रे आढळून येत नाहीत, अशा प्रकरणांबाबत चौकशी करण्यासाठी म्हाडाच्या स्तरावर "द्विसदस्यीय समिती" नेमण्यात आलेली आहे. सदर समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर संबंधित दोषी अधिकारी/ कर्मचारी यांची विरुध्द नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कल्याण (जि.ठाणे) तालुक्यातील मोठागाव-ठाकुर्ली-माणकोली उड्डाणपुलाच्या प्रकल्पात बाधित शेतकऱ्यांना मोबदला देण्याबाबत

**(७) ३४७६२ (२१-११-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण (जि.ठाणे) तालुक्यातील मोठागाव-ठाकुर्ली-माणकोली उड्डाणपुलाच्या भूमिपूजनाच्या वेळी या प्रकल्पात बाधित झालेल्या शेतकऱ्यांना १०० टक्के चांगला मोबदला देण्याचे मा.मुख्यमंत्री यांनी दिनांक १८ सप्टेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास घोषित केले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू घोषणेस एक वर्षाचा कालावधी उलटून गेल्यानंतरही शासनाने वा कल्याण-डोंबिवली महापालिकेने डोंबिवली विभागातील बाधित शेतकऱ्यांना कोणत्याही प्रकारचा मोबदला न दिल्याने सदरहू प्रकल्पास शेतकऱ्यांचा विरोध वाढत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून उक्त प्रकल्प बाधित शेतकऱ्यांना मोबदला देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे
(२) हे खरे नाही.

सदर रस्त्याखालील क्षेत्र कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेस हस्तांतरीत करण्यासाठी जमीनमालक यांना प्रोत्साहीत करणेकरीता दिनांक १६/१०/२०१७ रोजी संबंधित जमीनमालक यांच्यासोबत बैठक आयोजित करण्यात

आली होती. सदर रस्त्याने बाधित कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रामधील जमीनमालक यांचा सदर रस्त्याकरीता जागा देण्यास विरोध नसून त्यांनी त्यास संमती दर्शविलेली आहे.

(३) सदर रस्त्याने बाधित जमीनमालकांकडून प्रस्ताव प्राप्त झालेनंतर शासन धोरणाचे अनुषंगाने हस्तांतरणीय विकास हक्क प्रदान करणेबाबत कार्यवाही करण्यात येईल.

सद्य:स्थितीत सदर उड्डाणपुलाचे बांधकाम सुरू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**यवतमाळ जिल्हा परिषदेमध्ये वर्ग "क" व "ड" ची पदे रिक्त असल्याबाबत**

**(८) ३४९०१ (२३-११-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हापरिषदेच्या शिक्षण,आरोग्य,बांधकाम, समाजकल्याण, महिला व बालकल्याण तसेच पंचायत सिंचन विभागात वर्ग "क" व "ड" ची ३५० पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने रिक्त पदे भरण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) : (१)** होय. गट-क संवर्गातील पदे रिक्त आहेत.

(२), (३) व (४) वित विभागाने वेतनावरील खर्च नियंत्रित करण्यासंदर्भात दिनांक २ जून, २०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेल्या पदांपैकी ५०% किंवा संवर्गाच्या ४% जे कमी असेल ते एवढीच पदे भरण्याबाबतच्या तरतुदी आहेत.

त्यामुळे सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेली सर्व पदे भरण्यास निर्बंध आलेले आहेत. त्यामुळे पदे रिक्त राहिलेली आहेत.

पदोन्नतीच्या कोटयातील रिक्त असलेली पदे वेळोवेळी विभागीय पदोन्नती समितीच्या बैठका आयोजित करुन भरण्यात येतात.

राज्यातील सर्व जिल्हा परिषदेंतर्गत सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेली पदे ऑनलाईन पध्दतीने भरण्याबाबत निर्णय घेतला असून त्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २४/०८/२०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार रिक्त असलेली पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## मुंबईतील धोकादायक इमारतींच्या संरचनात्मक परिक्षणाबाबत

**(९) ३४९८२ (२२-११-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.हरिसिंग राठोड, श्रीमती हुस्नबानू खलिफे, आर्कि.अनंत गाडगीळ, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.बाळाराम पाटील, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील ३० वर्षे व त्यापेक्षा जुन्या इमारतींचे संरचनात्मक परिक्षण (स्ट्रक्चरल ऑडिट) करण्याचा निर्णय महापालिकेने माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत गृहनिर्माण सोसायटया व मालकांना नोटीसा देण्यात आल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, भेंडीबाजार (मुंबई) येथील हुसेनी इमारत कोसळून सुमारे ३३ लोक मृत्यू पावले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून मुंबईतील धोकादायक इमारतींची यादी घोषित करून तेथील नागरिकांना पर्यायी व्यवस्था देण्याबाबत व जीवित व वित्तीय हानी टाळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) असल्यास, धोकादायक इमारतीत राहणाऱ्या नागरिकांच्या पुनर्वसनाकरिता शासनाने कोणता धोरणात्मक निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१) मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३५३ (ब) अन्वये, ३० वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त जुन्या इमारतींना बांधकाम सुस्थिती प्रमाणपत्र (Structural Audit Report) सादर करणे बंधनकारक आहे.
(२) हे खरे आहे.
(३) भेंडीबाजार मधील स्ट्रीट, बोरी मोहल्ला येथील पाकमोडीया इमारत क्रमांक १३ ही उपकरप्राप्त इमारत कोसळून एकूण ३३ जण मृत पावले असून १४ जण जखमी झाले आहेत. तसेच, अग्निशमन दलाचे ६ अधिकारी/जवान जखमी झाले होते ही वस्तुस्थिती आहे.
(४) व (५) इमारतीच्या पुनर्बांधकामाच्या कालावधीविषयी भाडेकरूंना निश्चित अशी हमी दिली जात नसल्यामुळे भाडेकरु अशा धोकादायक इमारती रिकामी करत नाहीत.

याकरीता त्यांच्या निवाऱ्याचे संरक्षण व सुरक्षा सुनिश्चित करण्यासाठी मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३५४ व त्यानुषंगाने कलम ४९९ मध्ये सुधारणा करुन नवीन पोटकलम ३ ते ६ दाखल करण्यात आलेली आहेत.

मालकाने धोकादायक इमारतींची विहित मुदतीत पुनर्बांधणी न केल्यास सदर अधिनियमातील तरतुदींनुसार भाडेकरुंना सोसायटी तयार करुन इमारतींची पुनर्बांधणी करणे शक्य होणार आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील शौचालय दुरुस्तीत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(१०) ३४९९४ (२२-११-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हागणदारीमुक्त मुंबई करताना एकाच शौचालयाच्या दुरुस्तीत मुंबई महानगरपालिका आणि म्हाडा अशा दोन्ही प्रशासनानी वेगवेगळा खर्च केल्याची बाब निदर्शनास आली असून त्यात सुमारे २१४ कोटी रुपयांचा गैरव्यवहार झाल्याची लेखी तक्रार माहिती अधिकार कार्येकर्ते श्री.अनिल गलगली यांनी माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मा.मुख्यमंत्री यांचेकडे केलेली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१) दैनिक मुंबई मिरर या वृत्तपत्राच्या दिनांक ०२/०८/२०१७ रोजीच्या वृत्तपत्रातील बातमीनुसार श्री.अनिल गलगली यांनी माहिती अधिकार अंतर्गत माहिती प्राप्त करुन घेऊन बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या अधिकाऱ्याने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने चौकशी करण्याबाबत विनंती केली आहे.

(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेने माहिती अधिकार अर्जांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या अहवालाच्या अनुषंगाने चौकशी करण्याचे निदेश बृहन्मुंबई महानगरपालिकेस देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

___________

## ठाणे महानगरपालिकेतील कंत्राटी कर्मचाऱ्यांना नियमित सेवेत सामावून घेणेबाबत

**(११) ३५०७३ (२२-११-२०१७). ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३१४३१ ला दिनांक २६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे महानगरपालिका आस्थापनेवर कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांना कायम करण्याचा अधिकार असताना सुध्दा महानगरपालिका प्रशासनाने शासनाकडे मार्गदर्शन मागितले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ व त्यानंतर माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त महानगरपालिकेच्या आस्थापनेवर शासनाने केलेल्या पद निर्मितीनुसार रिक्त पदांवर अनेक वर्षांपासून काम करणाऱ्या सदर कंत्राटी कर्मचाऱ्यांना महानगरपालिका सेवेत कायम करण्याबाबत महानगरपालिकेस दिलेल्या सूचनांनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, कार्यवाहीचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१) व (२) होय.

- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५३ अन्वये कंत्राटी पध्दतीने सहा महिन्यापेक्षा कमी कालावधीकरीता नेमणूका करण्याचे अधिकार ठाणे महानगरपालिका यांना आहेत.
- कलम ५१ (४) नुसार महानगरपालिकेच्या आस्थापनेवर नवीन पद निर्मिती करण्याचे अधिकार शासनास निहित आहेत.
- पीसे-टेमघर येथील २१० द.ल.लि. पाणीपुरवठा योजनेवरील कार्यरत कंत्राटी कामगारांना ठाणे महानगरपालिकेच्या नियमित सेवेत सामावुन घेता येईल किंवा कसे याबाबत ठाणे महानगरपालिकेने दिनांक २२/०९/२०१६ रोजीच्या पत्राद्वारे दिशा निर्देश देण्याची विनंती केली होती.
- तसेच दिनांक २८/०९/२०१६ च्या पत्रान्वये अस्थायी पदांवर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना लिपीक संवर्गात सामावुन घेण्याकरीता मार्गदर्शन मिळण्याची विनंती केली होती.

- ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर त्यांनी केलेल्या विनंतीनुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५१ (४) नुसार नगर विकास विभागाने यापूर्वी दिनांक ३१/०१/२०००, दिनांक १८/०२/२००३ व दिनांक २३/०७/२००३ च्या शासन निणयान्वये एकूण १३१६ पदांना मंजुरी दिली होती.
- या मंजुर पदांवर सेवा प्रवेश नियम, सेवा जेष्ठता व वेळोवेळी शासनाने निर्गमित केलेले शासन आदेशांच्या अनुषंगाने निवड प्रक्रियेत पात्र ठरलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांना यापूर्वी ठाणे महानगरपालिकेत नियुक्ती देण्यात आली आहे.
- या प्रक्रियेद्वारे निवड न झालेल्या अस्थायी / कंत्राटी कर्मचाऱ्यांनी लोक प्रतिनिधीमार्फत वारंवार विनंती केल्यामुळे ठाणे महानगरपालिकेने माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये शासनाशी पत्र व्यवहार केला होता.

(३) उपरोक्त संदर्भीय पत्राच्या अनुषंगाने, "ठाणे महानगरपालिकेच्या मागणीनुसार शासनाने आवश्यक ती पद निर्मिती केलेली आहे. कर्नाटक राज्य विरुध्द उमादेवी प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने सन २००६ मध्ये दिलेल्या न्याय निर्णयानुसार मंजुर पदांवर केवळ विहित मार्गाने नियुक्ती करण्याबाबत शासनाचे धोरण आहे. त्यानुसार रिक्त पदांवर विहित प्रक्रियेचे अनुपालन करुन ठाणे महानगरपालिकने पद भरती करणे आवश्यक आहे." असे दिनांक १५/०३/२०१७ च्या पत्रान्वये ठाणे महानगरपालिकेस कळविण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**केकतपांगरी (ता.गेवराई, जि.बीड) साठवण तलाव योजनेचे काम सुरु करणेबाबत**

**(१२) ३५०८१ (२३-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३१५४१ ला दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केकतपांगरी (ता.गेवराई, जि.बीड) साठवण तलाव योजनेच्या भूसंपादन व कामाप्रित्यर्थ आवश्यक निधी मागणीचा प्रस्ताव दिनांक १९ जून, २०१७ रोजी क्षेत्रिय कार्यालयामार्फत महामंडळास प्राप्त झाला असून सदर निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, क्षेत्रिय कार्यालयास आतापर्यंत किती निधी वितरीत करण्यात आला असून किती संपादित जमिनीचा मावेजा वाटप करण्यात आला आहे,

(३) असल्यास, योजनेचे काम अद्याप सुरु झाले नाही, हे ही खरे आहे काय

(४) असल्यास, योजनेचे काम पूर्ण होण्यास झालेल्या विलंबाची करणे काय आहेत,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळले, संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**प्रा. राम शिंदे (०८-१२-२०१७) :** (१) होय. हे खरे आहे. योजनेसाठी भूसंपादनाचा निधी प्राप्त झाला असून निधी उपविभागीय अधिकारी (महसूल), बीड यांचेकडे दिनांक १९/०८/२०१७ रोजी वर्ग करण्यात आला असून त्यांचेमार्फत मावेजा वाटप करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(२) आतापर्यंत क्षेत्रिय कार्यालयास रुपये ४२९.७६ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यापैकी संपादित जमिनीच्या मावेजासाठी रुपये २८४.७६ लक्ष रक्कम उपविभागीय अधिकारी (महसूल), बीड यांचेकडे जमा करण्यात आली असून त्यांचेमार्फत रुपये २४८.६७ लक्ष मावेजा वाटप झाला आहे व उर्वरीत रुपये ३६.०९ लक्ष रक्कम मावेजापोटी वाटप करण्याची कार्यवाही चालू आहे.

(३) हे खरे नाही. योजनेचे दोन्ही तिरावरील काम पूर्ण झालेले असून कंदरभरणी, सांडवा व इतर अनुषंगिक कामे शिल्लक आहेत.

(४) भुसंपादनाचा मावेजा न मिळाल्यामुळे शेतकऱ्यांनी कंदरभरणीचे काम अडविले होते. सद्य:स्थितीत मावेजा वाटप करण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे. प्रकल्पाची उर्वरीत कामे मार्च, २०१८ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**बीड जिल्हयातील संजय गांधी निराधार योजनेचे प्रस्ताव प्रलंबित असल्याबाबत**

**(१३) ३५०८२ (२७-११-२०१७). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३१३२७ ला दिनांक ३ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गेवराई (जि.बीड) येथील संजय गांधी निराधार समितीची बैठक नियमित होत नसून लाभार्थींच्या बँक खात्यावर महिन्याच्या एक तारखेस नियमित निवृत्तीवेतन जमा होत नसल्याप्रकरणी तहसिलदार, गेवराई यांची चौकशी करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बीड जिल्ह्यात निराधारांचे किती प्रस्ताव तहसिलनिहाय मंजुरीसाठी प्रलंबित आहेत, प्रलंबित प्रकरणाबाबत बीड जिल्ह्यातील सर्व तालुक्यात बैठका घेऊन निराधारांना नियमित अनुदान वितरण करण्याचे निर्देश शासनाने दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी समितीच्या बैठका नियमित घेणे तसेच सदर योजनेच्या अनुदानात वाढ करण्याबाबतच्या विचाराधीन प्रस्तावांवर कधी निर्णय घेण्यात येणार आहे,

(४) असल्यास, बीड जिह्यातील निराधारांचे अनुदान व निवृत्तीवेतनाचे नियमित वाटप तसेच शासनाच्या दिनांक २७ जून, २०१३ व दिनांक १० एप्रिल, २०१५ रोजीच्या पत्रानुसार अंमलबजावणी करण्यात हलगर्जीपणा करणाऱ्यांविरुद्ध शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१४-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) बीड जिल्हयातील निराधारांचे तहसिलनिहाय बीड-४१९,गेवराई-१३७६, माजलगाव-०, वडवणी-३७, धारुर-१७८, परळी-५५०, अंबाजोगाई-०, केज-७७५, पाटोदा-११८, शिरुर-७०, आष्टी-० असे अर्ज प्रलंबित आहेत.

प्रलंबित अर्ज निकाली काढण्याबाबत व निराधारांना नियमित अनुदान वितरीत करण्याबाबत दिनांक २७ जून, २०१३ व दिनांक १० एप्रिल, २०१५ रोजीच्या पत्रान्वये सूचना दिल्या आहेत.

(३) समितीच्या बैठका नियमित घेण्यात येतात. तसेच सदर योजनेच्या अनुदानात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.
(४) बीड जिल्हयातील निराधारांचे अनुदान व निवृत्तीवेतनाचे नियमित वाटप तसेच शासनाच्या दिनांक २७ जून, २०१३ व दिनांक १० एप्रिल, २०१५ रोजीच्या पत्राची अंमलबजावणी न करणाऱ्यांविरुध्द चौकशी करुन कारवाई करण्यात येते.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**अल्पसंख्यांक संस्थामधील मराठी मानसेवी शिक्षकांचे वेतन मिळण्याबाबत**

**(१४) ३५२१२ (२०-११-२०१७). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अल्पसंख्यांक विभागाच्या निर्णयानुसार उर्दू भाषिक शाळांमधील नेमण्यात आलेल्या मानसेवी शिक्षकांना मान्यता आणि मानधन मिळाले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबतची वस्तुस्थिती आणि कारणे काय आहेत, तसेच या योजनेचा किती संस्था, विद्यार्थी यांना लाभ झाला आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मानसेवी शिक्षकांना मान्यता आणि मानधन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) सदर योजनेसाठी उपलब्ध तरतूदीपेक्षा जास्त रकमेची आवश्यकता असल्याने निधी वाटप अंशत: प्रलंबित आहे. तसेच सदर योजनेचा सन २०१६-१७ मध्ये एकूण ६५८ शाळा व १४५१९८ विद्यार्थ्यांना तसेच सन २०१७-१८ मध्ये ५२४ शाळांना व ११८६१६ विद्यार्थ्यांना लाभ झाला आहे.
(३) मानसेवी शिक्षकांचे मानधनाकरीता उर्वरित अनुदान उपलब्ध करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील विद्यार्थ्यांचे मानसिक स्वास्थ टिकविण्यासाठी प्राथमिक व माध्यमिक शाळेत समुपदेशकाची नियुक्ती करण्याबाबत**

**(१५) ३५२१८ (२०-११-२०१७). श्री.कपिल पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३२२०८ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिल्लीतील रायन स्कूलमधील दुर्दैवी घटनेनंतर महाराष्ट्रातील शाळांमधील विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी आणि मानसिक स्वास्थासाठी शासनाने काय कार्यवाही केली आहे,

(२) तसेच विद्यार्थ्यांचे मानसिक स्वास्थ टिकविण्यासाठी प्राथमिक, माध्यमिक शाळेत समुपदेशकाची नियुक्ती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१) राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन यांच्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्याच्या आपत्ती व्यवस्थापन संचालक यांच्या समन्वयाने मार्गदर्शक सूचना तयार करण्यात येत आहेत.

(२) प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात कला, क्रीडा, कार्यानुभव या विषयांसाठी अतिथी शिक्षकांना सेवेत कायम करण्याबाबत**

**(१६) ३५२३५ (२०-११-२०१७). श्री.कपिल पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, आर्कि.अनंत गाडगीळ : तारांकित प्रश्न क्रमांक ३२२१३ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी दिल्लीच्या धर्तीवर महाराष्ट्रातील कला, क्रीडा या विषयांसाठी अतिथी शिक्षकांना सेवेत कायम करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन असून मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने शंभरपेक्षा अधिक पटसंख्या असलेल्या शाळांमध्ये कला, क्रीडा, कार्यानुभव या विषयांसाठी अतिथी शिक्षक हे नियमित शिक्षकांबरोबर नियुक्त करता येतील मात्र नियमित शिक्षकांची नियुक्ती करणे गरजेचे असल्याचे निर्देश माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सध्या शाळांमध्ये कला, क्रीडा शिक्षकांच्या मंजूर पदांना आणि त्यावरील कार्यरत शिक्षकांना संरक्षण देण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मा.उच्च न्यायालयाच्या सदर निर्देशाचे पालन करण्यासाठी कार्यवाही करुन उच्च प्राथमिक आणि माध्यमिक स्तरावर कला, क्रीडा शिक्षकांना पूर्णवेळ शिक्षकांचा कार्यभार पूर्ववत देण्याबाबत शिक्षण विभागाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१), (२), (३) व (४) मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाच्या आदेशानुसार बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम, २००९ नुसार उच्च प्राथमिक शाळांमध्ये अंशकालीन निदेशकांची नियुक्ती तसेच अतिथी निदेशकांचे (Guest instructor) पथक (panel) तयार करण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक १ सप्टेंबर, २०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

**पुणे शहरातील कात्रज-कोंढवा मार्गावर वाहतुक कोंडीबाबत**

**(१७) ३५२४६ (२०-११-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहरातील कात्रज-कोंढवा रस्ता खडीमशीन चौक ते शत्रुंजय मंदीर चौकापर्यंत अरुंद व धोकादायक झाल्याने येथे जीवघेणी वाहतुक कोंडी व अपघात होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या रस्त्याचे रुंदीकरण व दुरुस्ती करण्याची मागणी नागरिकांकडून सातत्याने महानगरपालिकेकडे करुनही याकडे प्रशासनातील अधिकारी दुर्लक्ष करीत असल्याचीही बाब निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार येथील रस्त्याची दुरुस्ती व रुंदीकरण करण्याबाबत व या गंभीर बाबीकडे दुर्लक्ष करणाऱ्या महानगरपालिका अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१), (२) व (३) कात्रज-कोंढवा रस्ता, शत्रुंजय मंदीर, खडी मशीन चौक, पुणे हा रस्ता अरूंद व वक्राकार असल्याने तेथे वाहतुकीची कोंडी होत असून या रस्त्यावर सप्टेंबर, २०१७ मध्ये १ व ऑक्टोबर, २०१७ मध्ये २ अपघात झाले आहेत ही, वस्तुस्थिती आहे.

सदर रस्त्याच्या विकसनाबाबत लोकप्रतिनिधींकडून वेळोवेळी तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत.

विकास आराखड्यामध्ये प्रस्तावित केल्याप्रमाणे सदर रस्ता संपूर्णत: विकसित करण्यासाठी सन २०१२ व सन २०१४ तसेच सन २०१६ मध्ये निविदा मागविण्यात आल्या होत्या. परंतू निविदांचे दर अवाजवी असल्याने निविदेची कार्यवाही रद्द करण्यात आल्या होत्या.

याप्रकरणी प्राप्त निविदाधारकांचे दर जास्त असल्याचे दिसून आल्याने, पुणे महानगरपालिकेने याबाबत दिनांक २६/०९/२०१७ रोजी जाहिरात प्रसिध्द करून फेरनिविदा मागविल्या आहेत व त्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहरात वेश्या व्यवसाय सुरु असल्याबाबत

**(१८) ३५२७८ (१८-११-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.नरेंद्र पाटील, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहरातील एका पंचतारांकित हॉटेलमध्ये शहर पोलिसांच्या सामाजिक विभागाने छापा टाकून हायप्रोफाईल वेश्या व्यवसाय दिनांक ७ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आणला याचप्रकारे पुणे शहराच्या इतर भागातही वेश्या व्यवसाय होत असल्याचे सातत्याने निदर्शनास येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी करण्यात आली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-१२-२०१७) :** (१) सदर घटना माहे नोव्हेंबर, २०१७ मधील आहे.
(२) लष्कर पोलीस ठाणे, पुणे येथे गु.र.क्र.२३८/२०१७, अनैतिक मानवी व्यापार प्रतिबंधक अधिनियम कलम ३, ४, ५ सह भा.दं.वि. कलम ३७० व ३७०-अ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला आहे. पोलिसांनी केलेल्या कार्यवाहीमध्ये २ महिलांना ताब्यात घेतले असुन त्यातील एक महिला ही परदेशी आहे. या गुन्हयात एकूण ११ आरोपी निष्पन्न झाले होते त्यापैकी ५ आरोपींना अटक करण्यात आली असून गुन्हयाचा पुढील तपास सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जातीय हिंसाचाराच्या घटनांना प्रतिबंध घालण्याबाबत

**(१९) ३५३६७ (१७-११-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मागील तीन वर्षात जातीय हिंसाचाराच्या २७० घटना घडल्या असल्याचे माहे जुलै, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सन २०१६ मध्ये ६८, सन २०१५ मध्ये ६८ व सन २०१४ मध्ये ९७ जातीय हिसांचाराच्या घटना घडल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यातील जातीय हिंसाचाराच्या घटनांना प्रतिबंध घालण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१७) :** (१) व (२) महाराष्ट्र राज्यात मागील तीन वर्षात जातीय हिंसाचाराच्या २१३ घटना घडल्या आहेत सन २०१६ मध्ये ५७ गुन्हे, २०१५ मध्ये ८० गुन्हे, २०१४ मध्ये ७६ गुन्हे जातीय हिंसाचाराच्या घटना घडल्याच्या अनुषंगाने दाखल आहेत.
(३) राज्यात जातीय सलोखा राखण्याबाबत मार्गदर्शक सूचना व जातीय सलोखा हाताळण्याच्या कार्यपध्दतीबाबत राज्यातील सर्व पोलीस आयुक्त व पोलीस अधिक्षक यांना पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी परिपत्रकान्वये सूचना निर्गमित केल्या आहेत. तसेच पोलीस मित्र समितीच्या बैठका घेऊन जातीय सलोखा राखण्याबाबत सर्व संबंधितांना परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**शिक्षणाधिकारी (माध्य) जिल्हा परिषद, सोलापूर यांच्या गैरव्यवहाराची चौकशी करण्याबाबत**

**(२०) ३५५३८ (२३-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) श्री.सोनवणे, शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सोलापूर हे मागील २५ वर्षापासून नियुक्तीपासून एकाच जिल्ह्यात कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त जिल्ह्यातून त्यांची इतरत्र बदली न झाल्याने त्यांनी शिक्षण विभागात अनेक गैरप्रकार केले असून ते शिक्षकांशी उध्दटपणे वर्तन करीत असल्यामुळे व शिक्षकांची कामे वेळेवर करत नसल्याने नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी त्यांनी केलेल्या गैरव्यवहाराची चौकशी करण्याची मागणी शासनास दिनांक १० ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निवेदनाद्वारे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) अंशत: खरे आहे.

(३) शासनस्तरावरुन कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

### राज्यातील अतिरिक्त ठरलेल्या शिक्षण सेवकांना सेवा संरक्षण देण्याबाबत

**(२१) ३५५४० (२०-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.परिणय फुके, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे, श्री.बाळाराम पाटील, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शैक्षणिक सत्र सन २०१२-१३ च्या संच निर्धारणाच्या आधारे नियुक्त झालेल्या १०० शिक्षण सेवकांना शैक्षणिक सत्र २०१३-१४ च्या संच निर्धारणानंतर अतिरिक्त ठरलेल्या आधारावर कार्यभार व वेतन देण्यात आले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शैक्षणिक सत्र २०१३-१४ चे संच निर्धारण होण्यापर्यंत त्यांची सेवा सुमारे ३३ महिने झाली होती तसेच त्यांना ३३ महिन्याचे मानधन ही अदा करण्यात आले होते, त्यांच्या सेवा सातत्याकरीता फक्त ३ महिन्याचा कालावधी अपुरा होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील अशा सर्व शिक्षण सेवकांना सेवा संरक्षण देऊन सेवासातत्य देण्यात यावे व अतिरिक्त ठरत असल्यास इतर शाळेत समायोजित करावे अशी मागणी नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी शासनाला दिनांक ६ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारस निवेदन पाठवून केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अतिरिक्त ठरलेल्या शिक्षण सेवकांना सेवा संरक्षण देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३), (४) व (५) शासन निर्णय दिनांक २७/०६/२०१६ अन्वये सामायिक सेवाजेष्ठता ठेवून समायोजनाची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## राज्यातील शाळांमध्ये घेण्यात येणारा पायाभूत परीक्षेचा पेपर फुटल्याबाबत

**(२२) ३५५४२ (२०-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शाळांचा दर्जा सुधारण्यासाठी राज्यभरातील सर्व मंडळाच्या सर्व माध्यमांच्या शाळेत घेण्यात येणाऱ्या पायाभूत परीक्षेचा पेपर फुटल्याचे नुकतेच निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परीक्षेच्या नियमाप्रमाणे परीक्षेचे पेपर हे ऑनलाईन पद्धतीने दिले जात असून राज्यातील काही भागात विजेचा प्रश्न व अनेक तांत्रिक अडचणींमुळे आठवी व नववीचे विज्ञानाचे पेपर आधीच पाठविल्यामुळे हे पेपर फुटले, हे खरे आहे काय,

(३) तसेच पायाभूत चाचणीबाबत सुरू असलेला गोंधळ संपविण्यासाठी योग्यत्या उपाययोजना करण्याची मागणी नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक १५ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास निवेदन देऊन केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन परीक्षेचे पेपर शाळांना वेळेवर तसेच योग्य त्या अद्यावत तांत्रिक पद्धतीने पाठविण्याकरिता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) होय.

(४) पायाभूत चाचणीसाठी राज्यस्तरावरुन विद्यार्थ्यांच्या UDISE संख्येनुसार प्रश्नोत्तर पत्रिका छापून त्याचे वितरण जिल्हास्तरावर करण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील रात्रशाळांना माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालयात संच निर्धारण करून संच मान्यता देण्याबाबत

**(२३) ३५५४३ (२३-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.परिणय फुके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील १७६ रात्रशाळांना पूर्णवेळ शाळेचा दर्जा दिनांक १७ मे, २०१७ च्या शासन निर्णयानुसार प्रदान करण्यात आला व त्यानुसार मुख्याध्यापक, कनिष्ठ लिपिक व शिपाई ही पदे त्या कार्यभारानुसार पूर्णवेळ करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालयातील रात्रशाळांना मागील ३ वर्षापासून संच निर्धारण करून संच मान्यता प्रदान करण्यात आली नाही, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, संच निर्धारण करून संच मान्यता देवून त्यानुसार मुख्याध्यापक, लिपीक व शिपाई यांना कार्यभार देण्याबाबत तसेच त्यांच्या वेतनश्रेणीबाबतचा प्रश्न प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संच मान्यतेच्या तसेच वेतनश्रेणीच्या प्रश्नाबाबत संबंधित अधिकाऱ्यांना आदेश देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-१२-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे, अंशकालीन शिक्षकांना पूर्णकालीक शिक्षकांप्रमाणे मिळणाऱ्या वेतनश्रेणीच्या प्रमाणात वेतन अनुज्ञेय आहे.
(२) हे खरे नाही.
(३), (४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**आरटीई अंतर्गत प्रवेश दिलेल्या शाळेची शुल्क परतावा रक्कम अदा करण्याबाबत**

**(२४) ३५५४६ (२३-११-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर विभागातील इंग्रजी व मराठी माध्यमाच्या प्राथमिक शाळांनी आरटीई अंतर्गत विद्यार्थ्यांना मोफत प्रवेश दिला असून अशा मोफत प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांची शुल्क परतावा रक्कम शासनाने अदा करण्यास मान्यता दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सन २०१३-१४ पासून अनेक शाळांनी आरटीई अंतर्गत विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन त्यांच्या शुल्क परतावा रकमेची मागणी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अनेक शाळांना सन २०१३-१४ पासून शासनाने अद्यापपर्यंत शुल्क परतावा रक्कम अदा केली नसल्याने शाळांमध्ये आरटीई प्रवेश देण्याबाबत नाराजीचे वातावरण निर्माण झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आरटीई अंतर्गत विद्यार्थ्यांना शुल्क परतावा रक्कम देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-१२-२०१७) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) हे खरे नाही.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील शेतकऱ्यांच्या कर्जमाफीसाठी अनुसूचित जाती व जमातीच्या विकास कामांचा निधी देण्यात आल्याबाबत**

**(२५) ३५७३० (२७-११-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत शेतकऱ्यांच्या कर्जमाफीसाठी अनुसूचित जाती व जमातीच्या विकास कामांचा रुपये १००० कोटी इतका निधी वळता करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनुसूचित जाती व जमातीच्या विकास सुविधा व विकासात्मक कामे यासाठी असलेला निधी शेतकरी कर्जमाफीसाठी वळता करण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, सदर निधी शासन किती कालावधीत अनुसूचित जाती व जमाती विभागास परत उपलब्ध करुन देणार आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (१५-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गोंदिया व गोरेगाव (जि.गोंदिया) तालुक्यातील शेतकऱ्याची पाण्याअभावी गैरसोय झाल्याबाबत

**(२६) ३५८९३ (१७-११-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गोंदिया व गोरेगाव (जि.गोंदिया) तालुक्यातील शेतकरी गोंदिया शहर पांगोली नदीकाठावर वसलेले असून हजारो शेतकरी कुटुंब पिकासाठी पांगोली नदीच्या पाण्यावर अवलंबून आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सद्य:स्थितीत पांगोली नदी प्रदुषणग्रस्त झाली असून तीचे अस्तित्वच संपण्याच्या मार्गावर असून दोन्ही तालुक्यातील हजारो शेतकरी कुटुंब संकटात येत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत स्थानिक नागरीकांनी जिल्हाधिकारी, गोंदिया तसेच संबंधितांकडे तक्रारी करुनही कोणतीच कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-१२-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) पांगोली नदीच्या प्रदुषणाबाबत महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, नागपूर यांच्याकडे तक्रार प्राप्त झालेली नाही. तसेच जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्याकडेही तक्रार प्राप्त झाल्याचे दिसून येत नाही.

तथापि, पांगोली नदीच्या पाण्याचे दिनांक २९/११/२०१७ रोजी नमूने संकलित करण्यात आले असून पृथक्करण अहवाल अप्राप्त आहे.

त्याचबरोबर, मंडळाकडून गोंदिया नगरपरिषदेचे घरगुती सांडपाणी विनाप्रक्रिया पांगोली नदीत मिसळत असल्याने नगर परिषदेस दिनांक २०/०६/२०१५ व दिनांक २५/०७/२०१६ रोजी निर्देश देण्यात आलेले आहेत व त्याचबरोबर खटला दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**माध्यमिक शाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबत**

**(२७) ३५९८५ (२८-११-२०१७). श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३३१३१ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय चतुर्थश्रेणी कर्मचारी, महाविद्‌यालयीन चतुर्थश्रेणी कर्मचारी यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्यामुळे २४ वर्षानंतर आश्वासित प्रगती योजना शासनाने लागू केली असून खाजगी अनुदानित तसेच अनुदानित शाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने निर्णय दिला असूनही सदर योजनेचा लाभ दिला जात नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनेचा लाभ मिळण्याबाबत शिक्षकेतर संघटना व शिक्षक लोकप्रतिनिधींमार्फत शासनाकडे मागणी केली जात असून शासनाने लोकप्रतिनिधींना सदर योजना संबंधितांना लागू करण्याचे सभागृहात आश्वासित केले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजनेचा लाभ अनुदानित तसेच खाजगी अनुदानित माध्यमिक शाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) होय.

(३) व (४) शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

---

**सातारा जिल्हयातील विद्यार्थी आणि शिक्षक यांचे कायम स्वरूपी समावेशन करण्याबाबत**

**(२८) ३६०२५ (२३-११-२०१७). श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने जेथे वाडी वस्ती तिथे शाळा आणि शाळा तिथे २ शिक्षक अशी संकल्पना आणली असून विद्यार्थी पटसंख्येअभावी सातारा जिल्हयातील एकूण २७१३ शाळांपैकी ३०१ शाळा ५०० मीटर अंतरावर स्थलांतरित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, शिक्षणाचा हक्क अधिनियमानुसार प्रत्येक मुल शिकले पाहिजे याकरिता केंद्र आणि राज्य शासनाकडून सर्व शिक्षण अभियानास निधीची कमतरता असल्यामुळे उक्त स्थिती उद्‌भवली आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन या स्थलांतरित १९४१ विद्यार्थी आणि ५८५ शिक्षकांचे कायमस्वरूपी समावेशन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-१२-२०१७) :** (१) वाडी वस्ती तेथे शाळा ही संकल्पना सध्या अस्तित्वात नाही. सातारा जिल्हयातील ३०१ शाळा ५०० मीटर अंतरावर स्थलांतर करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला नाही.

(२), (३), (४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मुंबईतील माहिम परिसरात द्वारकामाई ही इमारत झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत गैरव्यवहारातून उभारण्यात आल्याबाबत**

**(२९) ३६०४० (२८-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील माहिम परिसरात द्वारकामाई ही १८ मजली इमारत झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत गैरव्यवहारातून उभारण्यात आली असल्याची बाब माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बनावट लाभार्थी तयार करून व नियमांचे उल्लंघन करून काही अधिकाऱ्यांच्या संगनमताने ही इमारत उभारल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, पुनर्विकास प्रकल्प राबविण्यासाठी संबंधित भूखंडावर किमान २५ झोपड्या असणे बंधनकारक असताना १६३ क्रमांकाच्या भूखंडावर केवळ १४ झोपड्या असताना पुनर्विकास प्रकल्प राबविण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सातव्या मजल्यावर फायर ब्रिगेडसाठी रिफ्युज एरिया रिक्त सोडणे आवश्यक असताना तेथे सदनिका बांधून त्या बाजारभावाने विकल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, प्रकल्पाशी संबंधित नसलेली व्यक्ती तक्रार करू शकत नाही या सबबीखाली या संबंधीची तक्रार फेटाळून माहिती अधिकारांतर्गत सुध्दा माहिती देणे टाळण्यात आले असून याप्रकरणी शासनाने चौकशी करून दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१३-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) सदर योजनेच्या मुळ परिशिष्ट-२ मध्ये अपात्र झोपडीधारकांना पात्र केल्याबाबत तक्रारदाराने मा.अतिरिक्त न्यायदंडाधिकारी, बांद्रा यांचेकडे केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने सी.आर.पी.सी. कलम २०२ अन्वये माहिम पोलीस ठाण्यास चौकशीचे आदेश दिले आहेत. पोलिसांनी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाशी पत्रव्यवहार केलेला असून प्राधिकरणाने केलेल्या व सुरु असलेल्या कार्यवाहीबाबत पोलिसांना दिनांक २४/११/२०१७ रोजी अवगत केले आहे.
(३) हे खरे नाही.

(४) इमारतीमधील पोडीयम मजल्यावर विकासकाने अनधिकृतपणे कार्यालय बांधल्याचे व रिफ्युज एरीयाच्या केलेल्या गैरवापराबाबत प्राधिकरणाकडे प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने पाहणीअंती अनधिकृत बांधकामाबाबत विकासकाविरुध्द MRTP Act १९६६ अंतर्गत प्राधिकारणाद्वारे कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.

(५) हे खरे नाही.

सदर प्रकरणी सचिव, झो.पु.प्रा. यांच्यामार्फत पात्रता झालेल्या आदेशाविरुध्द श्री.संतोष कुमार पांडे यांनी मा.उच्चाधिकार समिती यांचकडे अपील दाखल केले होते. मात्र सदर अपिल श्री.पांडे यांनी जनमाहिती अधिकार कार्यकर्ता म्हणून दाखल केलेली असल्याने व प्रस्तुत योजनेमध्ये श्री.पांडे हे झोपडीधारक नसल्याने त्यांचे अपील दिनांक १५/१०/२०१७ रोजी फेटाळण्यात आले. मा.उच्चाधिकार समितीच्या सदर निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात श्री.पांडे यांनी रीट याचिका क्र.१८८३/२०१६ दाखल केली होती. सदर याचिका देखील दिनांक २८/२/२०१७ च्या आदेशान्वये फेटाळण्यात आलेली आहे. सदर संस्थेसंबंधी श्री.संतोष कुमार पांडे यांनी माहिती अधिकारामध्ये अर्ज दाखल केला होता, त्यांना तत्कालीन जनमाहिती अधिकारी यांचेकडून माहिती प्राप्त न झाल्याने प्रथम अपिल दाखल करणेत आले होते. प्रथम अपिलामध्ये अर्जदारांना आवश्यक ती माहिती उपलब्ध करुन देण्यात आलेली असल्याचा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा अहवाल आहे.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे वाघिवली (ता.पनवेल, जि.रायगड) गावात शेतकऱ्यांची फसवणूक करण्यात आल्याबाबत

**(३०) ३६०४३ (२८-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव : तारांकित प्रश्न क्रमांक २६१११ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे वाघिवली (ता.पनवेल, जि.रायगड) गावात शेतकऱ्यांची सातबारावरून नावे वगळुन फसवणूक करण्यात आल्याची बाब माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वाघिवली गावात शेतकऱ्यांची सातबारावरून नावे वगळुन फसवणूक करण्यात आल्याबाबतचे पत्र मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांनी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांना दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त गावातील ६६ कुळांची नावे सातबारावरून वगळून तसेच फेरफार उताऱ्यामध्येही बदल करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, आपल्यावर झालेल्या अन्यायामुळे गावातील शेतकऱ्यांनी पोलीस प्रशासनाकडे आत्महत्या करण्याची परवानगी मागितली आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, तद्नुसार दोषीविरुद्ध कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०१७) :** (१), (२) व (३) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांनी दिनांक ११/०९/२०१७ रोजी पाठविलेल्या पत्राच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, मौजे वाघिवली ता.पनवेल, जि.रायगड येथील सर्व्हे क्र.१८२ मधील कुळांनी जमीन विकत घेण्याचे नाकारल्याने अतिरिक्त मामलेदार, पनवेल नं. १ यांच्या दिनांक १६/०८/१९६२ रोजीच्या आदेशानुसार सदर सर्व्हे नंबर मधील कुळांची नावे कमी करण्यात आली असल्याचे फेरफार क्र.१३७, दिनांक २९/१२/१९६४ वरून दिसून येत आहे.

मौजा वाघिवली येथील निवाडा क्र.२/९५ अन्वये संपादित करण्यात आलेल्या एकूण ६०.८३ हे.आर. जमिनीपोटी मूळ जमिनधारक यांचे वारसांना १२.५ टक्के योजनेअंतर्गत पात्रता मंजूर करण्यात आल्यानंतर सिडको महामंडळाने सी.बी.डी. बेलापूर येथे भूखंडाचे वाटप केलेले आहे. सदर बाब विचारात घेता दिनांक ११/९/२०१७ चे पत्र दिनांक ०१/११/२०१७ रोजी सिडको महामंडळाकडे पाठविण्यात आले आहे.

(४) होय, अर्जदार शेतकऱ्यांनी, सामुहिक आत्महत्या करण्याची परवानगी मिळण्याबाबत वरीष्ठ पोलीस निरीक्षक, एनआरआय सागरी पोलीस ठाण्याकडे दिलेल्या अर्जास अनुसरुन अर्जदार शेतकऱ्यांना सीआरपीसी १४९ अन्वये गैरकृत्य न करण्याबाबत नोटीसा देण्यात आल्या आहेत.
(५) व (६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शासनाच्या धोरणांचा प्रचार करण्यासाठी खाजगी कंपन्यांबरोबर करोडो रुपयांचा करार केल्याबाबत**

**(३१) ३६०७७ (०४-०१-२०१८). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य शासनाच्या विरोधात सोशल मिडियावर सुरु असलेल्या पोस्टमुळे नकारात्मक पोस्टना उत्तर देण्याबरोबरच शासनाच्या धोरणांचा प्रचार करण्यासाठी अकरा खाजगी कंपन्यांबरोबर करोडो रुपयांचा करार केल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील घेतलेल्या निर्णयामुळे शासनासाठी काम करणाऱ्या पॅनेलवरील संस्था रद्द करण्यात आल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जनतेच्या पैशात राजकीय प्रचार करण्याचा प्रयत्न असल्याचा आरोप शासनासाठी काम करणाऱ्या पॅनलवरील संस्था आणि व्यक्तींनी केला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सोशल मिडियासाठी जनतेच्या पैशाचा गैरवापर टाळण्यासाठी सदरील केलेला करार रद्द करुन शासनासाठी काम करणाऱ्या पॅनलवरील संस्थांना देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०१-२०१८) :** (१) ते (४) हे खरे नाही.

शासनाच्या विविध योजनांची माहिती जनतेपर्यंत पोहोचण्यासाठी तसेच विकासकामांची माहिती जनतेला व्हावी. यासाठी विविध प्रसारमाध्यमांचा वापर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्यावतीने करण्यात येतो. याप्रसिध्दीसाठी

लागणारे क्रिएटिव्ह तयार करण्यासाठी संस्थांचे पॅनल माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करण्यात येते. गेल्या पन्नास वर्षापासून माहितीपट, अनुबोधपट, निर्मितीसाठी पॅनल तयार केले जात होते. गेल्या काही वर्षात विविध प्रसिध्दीच्या माध्यमामंध्ये वाढ झाली आहे. त्यामुळे या वाढलेल्या माध्यमामंधून जास्तीत जास्त जनतेपर्यंत शासनाच्या लोकोपयोगी योजना पोहोचण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग निर्णय क्रमांक मावज-२०१५/प्र.क्र.३५०/३४, दिनांक १९/१०/२०१५ नुसार क्रिएटिव्ह तयार करण्यासाठी संस्थांचे पॅनल तयार करण्यात आले होते. या संस्थांची मुदत संपुष्टात आल्यामुळे दिनांक १२ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णय क्रमांक मावज-२०१७/प्र.क्र.२८७/३४ नुसार क्रिएटिव्ह तयार करण्यासाठी दोन वर्षासाठी संस्थांची नव्याने यादी तयार करण्यात आली आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अल्पसंख्याक शाळांमधील अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत

**(३२) ३६०८८ (२४-११-२०१७). ॲड.निरंजन डावखरे, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २९५२७ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अल्पसंख्यांक शाळांमधील अतिरिक्त शिक्षकांचे अन्य शाळांमध्ये समायोजन करण्याच्या प्रक्रियेनुसार समायोजन न झालेल्या शिक्षकांचे समायोजन होईपर्यंत विनाकाम विनावेतन तत्वाच्या आधारे त्यांचे वेतन अदा करण्यात येऊ नये असा शासनाने निर्णय घेतला असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(२) असल्यास, अल्पसंख्याक शाळांना राज्य घटनेच्या कलम ३० नुसार विशेष दर्जा प्राप्त झालेला असून या शाळेतील शिक्षकांना समायोजनाच्या नावाखाली वेतन नाकारणे हे भारतीय घटनेतील तरतुदींचा उल्लंघन करणारे असल्याचेही त्याचदरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर शासन निर्णयामुळे राज्यातील अल्पसंख्यांक शाळांमधील ५ हजार शिक्षकांच्या कायम सेवा धोक्यात येऊन त्यामध्ये ठाणे जिल्ह्यातील जवळपास ३०० शिक्षकांचा समावेश असून समायोजनाच्या कार्यवाहीत अल्पसंख्यांक शिक्षकांवर अन्याय करण्यात येऊ नये अशा आशयाचे निवेदन मा.शालेय शिक्षण मंत्री, प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग व शिक्षणाधिकारी (माध्य.), जिल्हा परिषद ठाणे यांना माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये शिक्षक सेना, ठाणे शहर संघटनेच्यावतीने देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अल्पसंख्यांक शाळांमधील अतिरिक्त झालेल्या शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१७) :** (१) होय, दिनांक १३ जुलै, २०१६ रोजी शासनाने असा निर्णय घेतला आहे.
(२) हे खरे नाही.
(३) अंशत: खरे आहे.
(४) शासन निर्णय दिनांक १३/०७/२०१६ अन्वये शिक्षकांचे समायोजनाची कार्यवाही चालू आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**महाराष्ट्र मराठी संघास पुन्हा अनुदान सुरु करण्याबाबत**

**(३३) ३६१५० (२४-११-२०१७). ॲड.निरंजन डावखरे, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठी विषयांच्या शिक्षक व विद्यार्थ्यांच्या गुणवत्तावाढीसाठी ३६ वर्षापूर्वी महाराष्ट्र मराठी शिक्षक संघ सुरु करण्यात आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या संघाला मराठी भाषेचा विस्तार, अभ्यासक्रमाबद्दल जागृती निर्माण करण्यासाठी तसेच शैक्षणिक त्रैमासिके चालविण्यासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळातर्फे दरवर्षी रुपये २५ हजार इतके दिले जाणारे अनुदान शासनाने सन २०१५ पासून बंद केल्याचे दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, मराठी शिक्षकसंघ व अध्यापक मंडळाचे कार्य लक्षात घेता, सदरचे अनुदान पुन्हा सुरु करण्याबाबत महाराष्ट्र मराठी शिक्षक संघाचे व अध्यापक मंडळाचे प्रतिनिधी यांनी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये मा.शालेय शिक्षण मंत्री तसेच अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृती मंडळ, पुणे यांना लेखी निवेदन दिले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर निवेदनानुसार महाराष्ट्र मराठी संघास पुन्हा अनुदान सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-१२-२०१७) :** (१) शिक्षण विभागाकडून देण्यात आलेल्या माहितीनुसार “महाराष्ट्र मराठी शिक्षक संघ” सुरू करण्याची कार्यवाही शालेय शिक्षण विभागाकडून करण्यात आलेली नाही. तथापि, सदर संस्था नोंदणीकृत संस्था असल्याचे दिसून येते.

(२) होय.

(३) होय.

(४) “महाराष्ट्र मराठी अध्यापक” या त्रैमासिकाला अनुदान पुन्हा सुरू करण्याबाबतचे प्राप्त झालेले निवेदन महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या पुढील बैठकीत विचारार्थ ठेवण्यात येणार आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील अट क्र.४ रद्द करण्याबाबत

**(३४) ३६१५४ (२४-११-२०१७). ॲड.निरंजन डावखरे, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शालेय शिक्षण विभागाने दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील अट क्र.४ नुसार, “प्राथमिक व उच्च प्राथमिक

शाळा या प्रगत शाळा व शाळा सिध्दीप्रमाणे “अ” ग्रेड आहेत व ज्या माध्यमिक शिक्षकांच्या वर्गाचा इयत्ता ९ वी व १० वी चा निकाल ८० टक्के किंवा त्यापेक्षा अधिक आहे त्यांनाच वरिष्ठ व निवडश्रेणीचा लाभ अनुज्ञेय राहील” असे नमूद केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासन निर्णयामध्ये नमूद केलेली ही अट महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील अनुसूची क चे उल्लंघन करणारी आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयातील सदर अट क्र. ४ शिक्षकांवर अन्याय करणारी व पदोन्नती मिळण्यापासून विलंब करणारी असल्यामुळे सदर अट रद्द करुन, चटोपाध्याय आयोगाच्या शिफारशीनुसार शिक्षकांना ८ व १६ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर वरिष्ठ/ निवड वेतनश्रेणी विनाअट सरसकट लागू करून पदोन्नती देण्याच्यादृष्टीने दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयाऐवजी सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याबाबतचे निवेदन शिक्षक प्रतिनिधी तसेच लोकप्रतिनिधींनी मा.शालेय शिक्षण मंत्री तसेच प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना दिनांक २४ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू निवेदनाच्या अनुषंगाने सदर अट रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-१२-२०१७) : (१)** होय.

(२) नाही.

(३) होय.

(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सामुहिक प्रोत्साहन योजनेचा लाभ घेऊन बंद ठेवलेल्या उद्योगांच्या हस्तांतरणाबाबत

**(३५) ३६१८१ (२८-११-२०१७). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील** : सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सामुहिक प्रोत्साहन योजनेचा लाभ घेतलेले परंतु अनेक वर्षापासून बंद असलेले उद्योग हस्तांतरण करण्यासाठी लोकप्रतिनिधींनी दिनांक २१ ऑगस्ट, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.उद्योग मंत्री यांना निवेदन दिलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने शासनामार्फत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (१५-१२-२०१७) :** (१) व (२) होय.

सामुहिक प्रोत्साहन योजनेच्या (साप्रोयो) प्रचलित नियमावलीमध्ये, साप्रोयो अंतर्गत लाभ घेतलेला उद्योग बंद पडल्यास खालील पध्दतीने घटक दायित्वाची परतफेड करुन पुर्नस्थापित/ हस्तांतरीत होऊ शकतो.

१. बंद पडलेल्या उद्योगाकडून उद्योग बंद असलेला कालावधी व एकूण प्रोत्साहनाचा कालावधी याच्या प्रमाणात प्रोत्साहन परत करता येते.

किंवा

२. बंद पडलेला उद्योग घटक एखाद्या नवीन उद्योजक घटक घेऊन उत्पादन सुरु करत असेल व अगोदरच्या उद्योगाचे साप्रोयो अंतर्गत दायित्व स्विकारण्यास तयार असेल तर अशा बंद उद्योगाच्या हस्तांतरणास परवानगी देण्यात येते.

(३) लागू नाही.

---

## शहापूर, भिवंडी व मुरबाड (जि.ठाणे) तालुक्यातील आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना सीलबंद दुधाचे वाटप करण्याबाबत

**(३६) ३६२५१ (२८-११-२०१७). श्री.रविंद्र फाटक** : सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शहापूर (जि.ठाणे) एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पांतर्गत असलेल्या शहापूर, भिवंडी व मुरबाड तालुक्यातील आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना आय.एस.ओ. नामांकन असलेल्या कंपन्याकडूनच सीलबंद (टेट्रा पॅक) दूध वाटप करण्याचे आदेश शासनाने दिले असतांनाही सुटे दूध वाटप करण्यात येत असणे तसेच आश्रमशाळेतील मुख्याध्यापक व अधिक्षकांनी आपल्या मर्जीतल्या ठेकेदारांना दुधाचे ठेके दिले असल्याचे माहे ऑक्टोंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आदिवासी भागातील वाढते कुपोषण दूर करुन सकस आहार देण्यासाठी शासन कोटयवधी रुपये खर्च करित असतांनाही सूटे दूध देण्यामागची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार यास जबाबदार असणाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१४-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

शहापूर (जि.ठाणे) एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पांतर्गत असलेल्या शहापूर, भिवंडी व मुरबाड तालुक्यातील आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना आय.एस.ओ. नामांकन असलेल्या कंपन्याकडूनच नामांकित ब्रॅन्डचे सीलबंद पिशवीत नियमित दुध पुरवठा सुरु आहे. कोणत्याही आश्रमशाळेत सुटया दुधाचा पुरवठा केला जात नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील लोकसंख्येच्या प्रमाणात तसेच मंजूर असलेली पोलिसांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३७) ३६३३० (२१-११-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात १० पोलीस आयुक्तालय, ३३ जिल्हा अधिक्षक कार्यालय, ८ परिक्षेत्र असून त्यामध्ये पोलिसांची सुमारे २ लाख १२ हजार पदे मंजूर असून प्रत्यक्षात अनेक पदे रिक्त असल्याने पोलिसांवर कामाचा अधिक ताण पडत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबईच्या वाढत्या लोकसंख्येनुसार पोलीस कर्मचाऱ्यांची संख्या ४ ते ५ पटीने वाढविणे आवशक आहे तसेच मा.उच्च न्यायालयाने पोलिसांच्या अपुऱ्या मनुष्यबळांवरून शासनावर वारंवार ताशेरे ओढले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुंबईची सध्याची लोकसंख्या सव्वा कोटी असून त्या तुलनेत पोलिसांची संख्या सुमारे ४४ हजारांच्या आसपास आहे प्रत्यक्ष कर्तव्यावरील पोलिसांची संख्या सुमारे ४१ हजार आहे त्यापैकी अंदाजे १३ हजार पोलीस कर्मचारी तर वाहतूक नियंत्रण, नेत्यांची सुरक्षा, कैद्याची न्यायालयात ने-आण करण्यासाठी लागत असल्याने पोलिसांना याचा त्रास होत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यातील लोकसंख्येच्या प्रमाणात तसेच मंजूर असलेली पोलिसांची रिक्त पदे विनाविलंब भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-१२-२०१७) :** (१) राज्यात १० पोलीस आयुक्तालये, ३६ जिल्हा अधिक्षक कार्यालय, ८ परिक्षेत्र असुन पोलीस उप अधिक्षक ते पोलीस शिपाई दर्जापर्यंतच्या पोलीस अधिकारी / कर्मचाऱ्यांची एकूण मंजूर पदे २१९७६४ इतकी असुन, १२५४५ इतकी पदे रिक्त आहेत. सदरची रिक्त पदे फक्त ६% असुन केवळ त्यामुळे पोलीसांवर कामाचा ताण पडत आहे, हे म्हणणे खरे नाही.

(२) पोलीस आयुक्त, मुंबई यांचेकडून सुधारीत आकृतीबंधचा प्रस्ताव प्राप्त असुन त्याची छाननी शासन पातळीवर करण्यात येत आहे.

(३) मुंबई पोलीस दलासाठी एकुण मंजुर पदे ५०६७८ पदापैकी सशस्त्र पोलीस कार्यालयास १३५४५ पदे मंजूर असुन सदर मनुष्यबळातुन नेत्यांची सुरक्षा व कैद्यांची ने-आण करण्यासाठी लागत असलेले मनुष्यबळ पुरविण्यात येते, तसेच वाहतुक विभागास ३५९५ पदे मंजूर असुन सदर मनुष्यबळाचा वापर मुंबईतील

संपुर्ण वाहतुकीचे नियंत्रण व नियमण करण्याकरीता होतो, उर्वरित ३३५३८ पदांचे वाटप कायदा व सुव्यवस्था राखणेकामी पोलीस ठाणे, गुन्हे शाखा वि.शा. यांस करण्यात आले असुन त्यांचा वापर वाहतूक नियंत्रण, नेत्यांची सुरक्षा, कैद्यांची न्यायालयात ने-आण करण्यासाठी होत नाही.
(४) व (५) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार पद निर्मिती तसेच रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे.

---

**मुंबई शहरातील मोडकळीस आलेल्या इमारतींच्या पुनर्वसनासाठी विकास नियंत्रण नियमावलीत सुधारणा करण्याबाबत**

**(३८) ३६३४१ (२९-११-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहरातील विशेषत: दक्षिण मुंबईतील जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींच्या पुनर्वसनासाठी विकास नियंत्रण नियमावलीत सुधारणा करण्याचा निर्णय राज्य शासनाने माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत मुंबईतील लोकप्रतिनिधींनी शासनास अनेक पत्राद्वारे निवेदने सादर केली आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी लोकप्रतिनिधींनी सादर केलेल्या निवेदनाच्या आधारे शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१३-१२-२०१७) :** (१), (२) व (३) मुंबई शहर व उपनगरातील जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींशी निगडीत धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीत आवश्यक सुधारणाबाबत शासनास शिफारस करण्याकरिता ८ विधानसभा/ विधानपरिषद सदस्यांची समिती शासनाच्या दिनांक २९/१०/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली आहे. सदर समितीतील सदस्यांनी याबाबत शासनास शिफारसी सादर

केल्या असून सदर शिफारसी/ निवेदनाच्या अनुषंगाने विकास नियंत्रण नियमावली ३३(७) व ३३(९) मध्ये व तसेच म्हाडा अधिनियमात सुधारणा करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील मुख्य माहिती आयुक्तांचे रिक्त पद भरण्याबाबत

**(३९) ३६३४५ (२१-११-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील मुख्य माहिती आयुक्तांचे पद गत सहा महिन्यापासून रिक्त आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परिणामी अन्य खंडपीठाचाही कारभार पूर्णपणे ठप्प असून विविध खंडपीठाकडे सुमारे ३९ हजार द्वितीय अपिल प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून मुख्य माहिती आयुक्तांचे पद भरण्याबाबत तसेच माहिती अधिकारांतर्गत प्रलंबित असलेली प्रकरणे निकाली काढण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-१२-२०१७) :** (१) होय.
(२) नाही, राज्यातील केवळ राज्य मुख्य माहिती आयुक्ताचे पद रिक्त आहे, सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार मा.राज्य माहिती आयुक्त, बृहन्मुंबई यांचेकडे सोपविण्यात आलेला आहे. अन्य सर्व खंडपीठांवर राज्य माहिती आयुक्त कार्यरत असून तेथील कामकाज सुरु आहे. तथापि, माहिती अधिकाराबाबत जनमानसातील जागरुकता वाढत असून आयोगाकडे येणाऱ्या द्वितीय अपिल प्रकरणांची संख्याही दिवसेंदिवस वाढत आहे. त्यामुळे माहे ऑक्टोबर, २०१७ अखेरीस राज्य माहिती आयोगाकडील प्रलंबित द्वितीय अपिल प्रकरणांची संख्या

३८५७९ इतकी आहे.

(३) व (४) राज्य मुख्य माहिती आयुक्ताचे रिक्त पद भरण्याची कार्यवाही शासन स्तरावरुन सुरु आहे.

---

**मालाड-मालवणी मधील म्हाडाच्या लॉटरीतील विजेत्यांना घरांचा ताबा देणेबाबत**

**(४०) ३६३६९ (२८-११-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांसाठी सन २०१५ मध्ये म्हाडाने मालाड-मालवणी मधील घरांसाठी काढलेल्या लॉटरीतील म्हाडाच्या इमारतींमधील १६८ घरांना मुंबई महानगरपालिकेने ओ.सी देऊनही सदर घरांचा ताबा विजेत्यांना म्हाडाने दिलेला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, म्हाडाच्या लॉटरीतील विजेत्यांनी घरांची संपूर्ण १९ लाख रुपयांची रक्कम म्हाडाकडे जमा केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, म्हाडाच्या लॉटरीतील विजेत्यांना घरांचा ताबा देण्यासाठी अजून किती कालावधी लागणार आहे,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०७-१२-२०१७) :** (१) उपाध्यक्ष, म्हाडा यांचेकडून प्राप्त अहवालानुसार, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळाने २०१५ मध्ये मालवणी मालाड येथील (संकेत क्रमांक ३१४) बांधकाम सुरु असलेल्या मालवणी मालाड येथील अत्यल्प उत्पन्न गटाच्या २३२ सदनिकांची सोडतीमार्फत विक्रीची जाहिरात प्रसिध्द दिली होती.

सदरहू सोडतीमध्ये यशस्वी ठरलेल्या २३२ लाभार्थ्यांपैकी २०४ अर्जदार सदनिका वितरणास पात्र ठरले होते. सदरहू इमारतींना दिनांक ०१/०९/२०१७ व दिनांक १२/१०/२०१७ रोजी महानगरपालिकेने भोगवटा प्रमाणपत्र दिले असल्याने पात्र लाभार्थ्यांपैकी १२१ लाभार्थ्यांना सदनिकांचे ताबा वितरणपत्र देण्यात आले

आहे व त्यापैकी १११ लाभार्थ्यांनी प्रत्यक्ष सदनिकांचा ताबा घेतला आहे.

(२) सोडतीतील लाभार्थ्यांनी मंडळाकडून वितरित करण्यात आलेल्या देकारपत्राच्या अनुषंगाने माहे ऑगस्ट, २०१६ पासून सदनिकेच्या विक्री किंमतीपोटी एकूण २३२ पैकी १७० सदनिकाधारकांनी पूर्ण रक्कम जमा केली आहे, असे म्हाडाच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.

(३) व (४) सदरहू इमारतींना दिनांक १/९/२०१७ व दिनांक १२/१०/२०१७ रोजी महानगरपालिकेने भोगवटा प्रमाणपत्र वितरित केले असून सोडतीतील २३२ यशस्वी लाभार्थ्यांपैकी १२१ लाभार्थ्यांना सदनिकेचा ताबा प्रमाणपत्र देण्यात आले आहे. यापैकी १११ लाभार्थ्यांनी प्रत्यक्ष सदनिकेचा ताबा घेतला आहे. पूर्ण रक्कम भरलेल्या इतर सदनिकाधारकांना सदनिकेचा ताबा वितरणप्रक्रीया प्रगतीपथावर आहे. तसेच उर्वरित सदनिकाधारकांनी सदनिकेची पूर्ण विक्री किंमत भरल्यानंतरच ताबा देणे शक्य होईल, उपाध्यक्ष, म्हाडा यांनी त्यांच्या अहवालात नमूद केले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर शहरात स्मार्ट सिटी अंतर्गत करण्यात आलेल्या खर्चाच्या विरोधात आंदोलन केल्याबाबत

**(४१) ३६५२६ (१८-११-२०१७). श्री.प्रविण दरेकर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर शहरात रंगभवन ते आंबेडकर चौक या एक ते दिड किलोमीटरच्या सुस्थितीत आणि मजबूत तसेच एकही खड्डा नसलेल्या रस्त्यावर स्मार्ट सिटी अंतर्गत रूपये २१ कोटी खर्च करण्यात आल्याच्या विरोधात दिनांक २४ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास आंदोलन केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-१२-२०१७) :** (१) स्मार्ट सिटी प्रस्तावातील स्वच्छ पर्यावरण करणेकरीता धुळ व प्रदुषण दुर करणे, रस्त्याचे रीडिझाईन करणे याअंतर्गत पथदर्शी प्रकल्प म्हणून सोलापूर शहरातील जास्त रहदारी असलेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर चौक - डफरीनचौक - रंगभवन चौक हा रस्ता निवडला आहे.

सदर रस्त्याची लांबी १.१० कि.मी. इतकी आहे. सदर रस्त्याची मंजूर किंमत २०.९७ कोटी इतकी आहे.

सदर रस्त्याच्या कामाचे भूमिपुजन दिनांक २२/०९/२०१७ रोजी आयोजित केले होते. भूमिपूजन समारंभाच्या अगोदर बहुजन समाज पार्टी पक्षाच्या वतीने सदर कामाविरोधात आंदोलन केले गेले. परंतु त्याचे कोणतेही अधिकृत पत्र सोलापूर महानगरपालिका कार्यालयास प्राप्त झाले नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**रायगड जिल्हयात राष्ट्रीय पेयजल योजनेसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**(४२) ३६५८० (२४-११-२०१७). श्री.जयंत पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३२४९० ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्हयातील अनेक गावांमध्ये पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होत असल्याने गावांमध्ये पाणीपुरवठा करण्यासाठी राष्ट्रीय पेयजल योजनेसाठी शासनाकडून निधी उपलब्ध झालेला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजना नव्याने सुरु करण्यासाठी सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देवून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१४-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्श्यातील प्राप्त झालेला रुपये १.४४ कोटी इतका निधी जिल्हा परिषदेच्या खात्यावर जमा

करण्याकरीता कोषागार कार्यालय, अलिबाग, रायगड यांच्याकडे देयक सादर करण्यात आले आहे. तसेच १६ जिल्हा परिषदांकडून प्राप्त झालेल्या निधीच्या मागणीनुसार उपलब्ध करुन देण्यात आलेल्या एकूण रुपये ४७.३६७९ कोटी निधीपैकी रुपये २.०० कोटी इतका निधी रायगड जिल्हा परिषदेस उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सुधारीत अंदाजपत्रक मंजूरीबाबत सुयोग्य प्रस्ताव प्राप्त झाल्यास त्यास मान्यता देण्याची कार्यवाही करण्यात येते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**रायगड जिल्हयातील नदी काठांवर सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प उभारण्याबाबत**

**(४३) ३६५८६ (२४-११-२०१७). श्री.जयंत पाटील, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्ह्यात पाण्याच्या स्त्रोतांचे प्रदूषण होण्याच्या तक्रारी येत असल्यामुळे नदीकाठांवरील गावांमधून नदीत येणारे सांडपाणी हे प्रक्रिया करुन नदीत सोडण्यासाठी प्रक्रिया प्रकल्प अहवाल तयार करण्याचे निर्देश जिल्हाधिकारी, रायगड यांनी दिनांक २३ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रक्रिया प्रकल्पाचा अहवाल तयार करण्यासाठी अभ्यासगटाची निवड करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्पाचा अहवाल तयार करण्यात आला आहे काय,
(४) असल्यास, रायगड जिल्ह्यात एकूण किती ठिकाणी सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प उभारण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे ?

**श्री.रामदास कदम (१४-१२-२०१७) :** (१) याबाबत दिनांक १३/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, रायगड यांनी पर्यावरण विभागास कळविले आहे.
(२), (३) व (४) त्यानुषंगाने राज्य नदी संवर्धन योजनेतील मार्गदर्शक तत्वानूसार प्रस्ताव/सविस्तर प्रकल्प अहवाल इ. तयार करुन ते पर्यावरण विभागास सादर करण्याबाबत पर्यावरण विभागाने दिनांक ०१/०३/२०१४ रोजी निर्गमित केलेल्या

शासन निर्णयानूसार कार्यवाही करणेबाबत अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, प्रधान सचिव, नगर विकास विभाग व जिल्हाधिकारी, रायगड यांना दिनांक १४/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

---

**रायगड जिल्ह्यातील आदिवासी समाज अन्न अधिकारासाठी आंदोलन केल्याबाबत**

**(४४) ३६५९० (२४-११-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्ह्यातील आदिवासी समाजाने रायगड जिल्हाधिकारी, कार्यालयासमोर अन्न अधिकारासाठी दिनांक १२ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास आंदोलन केले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यात अन्न सुरक्षा कायदा लागू झाल्यानंतर केशरी शिधापत्रिकाधारक कुटुंबांपैकी १ कोटी ७७ लाख शिधापत्रिकाधारक कुटुंबे रेशन मिळण्यापासून वंचित असून गरीब कुटुंबांची रास्त भाव दुकानावर मिळणारी साखर ऐन दिवाळीत बंद करण्यात आली होती, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, आदिवासी समाजातील कुटुंबे केरोसीनचा वापर करत असल्यामुळे त्यांना रास्त दरात माणसी दोन लिटर केरोसीन देण्यात यावे अशी मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आदिवासी समाजासाठी स्वस्त दरात अन्न धान्य पुरवठा करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१४-१२-२०१७) :** (१) होय.
(२) अंशत: खरे आहे.
(३) होय
(४) चौकशीचा प्रश्न उद्‌भवत नाही. राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत समावेश करण्यात आलेल्या सर्व पात्र लाभार्थ्यांना नियमितपणे

अन्नधान्याचा पुरवठा करण्यात येत आहे. तसेच राज्यातील शहरी व ग्रामीण भागातील बिगर गॅसधारक शिधापत्रिकाधारकांना विहीत परिमाणानुसार केरोसीनचे वाटप करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मागासवर्गीय विद्यार्थ्यांना परदेशी शिष्यवृत्ती न मिळाल्याबाबत

**(४५) ३६९०३ (२७-११-२०१७). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जागतिक विद्यापीठाच्या १ ते ३०० या क्रमवारीतील संलग्न विद्यापीठांमधील प्रवेशासाठी शैक्षणिक शुल्क वाढीस राज्याच्या लेखापरीक्षकांनी घेतलेल्या आक्षेपांमुळे मागासवर्गीय विद्यार्थ्यांना परदेशी शिष्यवृत्ती मिळाल्या नाहीत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परदेशी शिष्यवृत्ती न मिळण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१८-१२-२०१७) : (१)** हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे जिल्हयात शुल्क वाढ केलेल्या शाळांवर कारवाई करण्याबाबत

**(४६) ३६९७७ (२४-११-२०१७). श्री.अनिल भोसले : तारांकित प्रश्न क्रमांक ३१०८८ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हयातील १८ शाळांनी अन्यायकारक शुल्क वाढ केल्याची तक्रार मागील पाच वर्षांपासून पालकांनी केली असून याबाबत शाळांवर कोणतीच कारवाई शासनामार्फत केली जात नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार अन्यायकारक शुल्कवाढ करणाऱ्या या १८ शाळांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-१२-२०१७) :** (१) पुणे जिल्हयातील १८ शाळांबाबत पालकांनी फी वाढीसंदर्भात तक्रारी केल्या आहेत, हे खरे आहे.
(२) फी वाढीच्या तक्रारींवर विभागीय शुल्क नियामक समिती, पुणे यांच्याकडून सुनावणी घेऊन पुढील कार्यवाही करण्यात येते.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मांडवी, आचोळे व पेल्हार (जि.पालघर) येथे पोलीस ठाण्यांची निर्मिती करण्याबाबत

**(४७) ३७०४३ (२१-११-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मांडवी, आचोळे व पेल्हार (जि.पालघर) येथे पोलीस ठाण्यांची निर्मिती करण्याबाबतचा प्रस्ताव पोलीस अधिक्षक, पालघर यांनी शासनाकडे दिनांक ३० एप्रिल, २०१५ व दिनांक ७ एप्रिल, २०१५ रोजी वा त्यासुमारास सादर केले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वसई-विरार उपप्रदेशाची वाढती लोकसंख्या तसेच कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीने सदर पोलीस ठाण्यांची किती कालावधीत निर्मिती करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-१२-२०१७) :** (१) व (२) नालासोपारा पोलीस ठाण्याचे विभाजन करुन आचोळे पोलीस ठाणे व विरार पोलीस ठाण्याचे विभाजन करुन मांडवी पोलीस ठाणे निर्माण करण्याची बाब राज्य पोलीस दलातील पदनिर्मितीच्या दुसऱ्या टप्प्याच्या प्रस्तावामध्ये समाविष्ट करण्यात आली आहे. सदर प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता त्यावर वित्त विभागाने त्यांच्या दिनांक २५/०५/२०१७ च्या शासन निर्णयानुसार पोलीस दलाचा आकृतीबंध निश्चित करुन प्रस्ताव फेरसादर करावा, असे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच पोलीस अधिक्षक, पालघर यांच्या आस्थापनेवरील नालासोपारा व वालीव पोलीस ठाण्याचे विभाजन करुन पेल्हार पोलीस ठाणे निर्माण करणेबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई विदयापीठातील शिक्षक व कर्मचारी यांचे थकीत वेतन अदा करण्याबाबत**

**(४८) ३७२८४ (२४-११-२०१७). श्री.संजय दत्त :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई विदयापीठातील शिक्षक व कर्मचाऱ्यांचे ऑक्टोबर महिन्याचे वेतन अदा करण्यासाठी विदयापीठाकडे पैसे नसल्याचे माहे ऑक्टोबर,२०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाविदयालयांकडे कोटयवधी रुपयांचा निधी थकीत असून शासनाकडून मिळणारा निधी बंद झाल्याने विदयापीठ आर्थिक अडचणीत आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विदयापीठांचा कोटयवधी रुपयांचा निधी थकीत ठेवणाऱ्या महाविदयालयांवर कारवाई करुन विदयापीठातील शिक्षक व कर्मचारी यांचे थकीत/ वेतन देण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रायगड जिल्ह्यातील खरेदी विक्री संघाला विक्रीचे कमिशन आणि खरेदीचा खर्च देण्याबाबत

**(४९) ३७४६२ (२४-११-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्ह्यातील खरेदी विक्री संघाकडून हमी भावाने भात खरेदी केला जात असून सदर खरेदी-विक्री संघाला शासनाने मागील आठ वर्षापासून भात खरेदीचे कमिशन, खरेदीचा खर्च तसेच गोदामाचे भाडे दिले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, खरेदी विक्री संघाने सन २०१७-१८ या वर्षीच्या हमी भावाने भात खरेदी न करण्याचा निर्णय घेतला असून शेतकऱ्यांचा भात अन्य एजन्सीमार्फत कमी भावाने खरेदी केल्याने शेतकऱ्यांचे आर्थिक नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन हमी भावाने भात खरेदी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०८-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

फक्त पणन हंगाम २०१५-१६ मध्ये खरेदी झालेल्या धानाची अंशत: रक्कम प्रलंबित आहे. तसेच सन २०१६-१७ मध्ये खरेदी झालेल्या धानाची भरडाई होऊन तांदळाची उचल सुरु आहे. सदर तांदळाची उचल झाल्यावर संस्थांना कमिशन आकार देण्यात येईल.

पणन हंगाम २००९-१० ते २०१४-१५ या कालावधीतील गोदाम भाड्याबाबतचा प्रस्ताव या विभागाने वित्त विभागास दिनांक २३/१२/२०१६ रोजी

मान्यतेसाठी सादर केला होता. सदरहू प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाने विचारणा केलेल्या माहितीसह प्रस्ताव वित्त विभागाकडे दिनांक १३/०७/२०१७ रोजी मान्यतेसाठी सादर करण्यात आलेला होता. तथापि, वित्त विभागाने पुन:श्च काही मुद्दे उपस्थित केले आहेत. त्यास अनुसरुन दिनांक १८/१०/२०१७ रोजी प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी फेरसादर करण्यात आला आहे.

(२) हे खरे नाही.

अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या दिनांक ०४/१०/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये रायगड जिल्हयात ३० धान खरेदी केंद्रांना मंजुरी देण्यात आली असून त्यापैकी १७ धान खरेदी केंद्रावर धान खरेदी सुरु आहे.

तसेच पणन हंगाम २०१७-१८ मध्ये शासनाने निर्धारित केलेल्या आधारभूत किंमतीपेक्षा कमी दराने धान खरेदी होऊ नये याकरिता जिल्हा निबंधक यांना त्यांच्या अखत्यारित असलेल्या सर्व कृषी उत्पन्न बाजार समित्यांना खाजगी व्यापाऱ्यांवर दंडात्मक कारवाई करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

(३) व (४) प्रश्न उदभवत नाही.

---

**पुणे विभागातील अनुदानित महाविद्यालयांचे अनुदान निश्चित करण्याबाबत**

**(५०) ३७४७२ (२४-११-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे विभागातील अनुदानित महाविद्यालयांना शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुदानापोटी दिलेल्या रक्कमांचे अनुदान निश्चित न झाल्याने शासनाचे सुमारे ५० कोटी रुपये १५ वर्षापासून महाविद्यालयांकडेच असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार पुणे विभागातील अनुदानित महाविद्यालयांचे अनुदान निश्चित करुन अनुदानापोटी दिलेल्या रक्कमेची वसुली करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (११-१२-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) पुणे विभागातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांच्या अनुदान निर्धारणामध्ये वेतनापोटी रुपये ५.७५ कोटी इतकी रक्कम वसुलपात्र असल्याचे निदर्शनास आले आहे. सदर वेतन अनुदानाची वसुलपात्र रक्कम ही वेतनेतर अनुदानापोटी देय असलेली रक्कम निर्धारीत झाल्यानंतर ती रक्कम समायोजित करुन निव्वळ वसुलपात्र रक्कम संबंधित महाविद्यालयांकडून वसुल करण्याची तजविज ठेवण्यात आली आहे. अनुदान निर्धारणाची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.